**नाट्यनिर्मिती संस्थांना नवीन नाट्य निर्मितीसाठी अनुदान योजनेअंतर्गत नाट्य परीक्षण समितीची पुनर्रचना करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय क्र. नासंअ ४८१८/प्र.क्र. ३५० /सां.का.४**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : १२ फेब्रुवारी, २०१९**

वाचा :- शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र. नासंअ ४८१५/प्र.क्र.११७/ सां.का.४, दिनांक २८ ऑक्टोबर, २०१५

**प्रस्तावना :-**

उपर्निर्दिष्ट शासन निर्णयान्वये नाट्यनिर्मिती संस्थांना नवीन नाट्यनिर्मितीसाठी अनुदान योजनेअंतर्गत नाट्य परीक्षण समिती स्थापना करण्यात आली होती. सदर नाट्य परीक्षण समितीचा कालावधी संपुष्टात आल्याने नवीन नाट्य परीक्षण समिती पुनर्गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

व्यावसायिक व प्रायोगिक नाट्यनिर्मितीस अनुदान योजनेअंतर्गत नाटकाचा दर्जा ठरविण्यासाठी खालीलप्रमाणे नाट्य परीक्षण समिती (व्यावसायिक, संगीत व प्रायोगिक) गठीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**व्यावसायिक व संगीत तसेच प्रायोगिक नाटकांचे परीक्षण करण्यासाठी गठीत करावयाची परीक्षण समिती खालीलप्रमाणे आहे.**

| | |
|---|---|
| १. श्री. श्रीनिवास भणगे, पुणे | सदस्य |
| २. श्री. कुमार सोहोनी, मुंबई | सदस्य |
| ३. श्री. शितल तळपदे, मुंबई | सदस्य |
| ४. श्री. विजय कदम, मुंबई | सदस्य |
| ५. श्री. विठ्ठल बडधंची, कोल्हापूर | सदस्य |
| ६. श्री. प्रकाश निमकर, मुंबई | सदस्य |
| ७. श्री. दिलीप जाधव, मुंबई | सदस्य |
| ८. श्री. दिनू पेडणेकर, मुंबई | सदस्य |
| ९. श्री. अरविंद औंधे, मुंबई | सदस्य |
| १०.श्री. संजय डहाळे, मुंबई | सदस्य |
| ११.श्री. विलास विष्णू कुलकर्णी, पुणे | सदस्य |
| १२.श्री. सुनिल देवळेकर, मुंबई | सदस्य |
| १३.श्री. दिगंबर प्रभू, मुंबई | सदस्य |
| १४.श्रीमती शितल क्षिरसागर, मुंबई | सदस्य |

| | |
|---|---|
| १५.श्रीमती अमिता खोपकर, मुंबई | सदस्य |
| १६.श्री. राजन भिसे, मुंबई | सदस्य |
| १७.श्री. राज कुबेर, पुणे | सदस्य |
| १८. श्री. शेखर लोहकरे, पुणे | सदस्य |
| १९. श्री. अरुण होर्णेकर, मुंबई | सदस्य |
| २०. श्रीमती ऐश्वर्या नारकर, मुंबई | सदस्य |
| २१. श्री. बुध्ददास केशव कदम, मुंबई | सदस्य |
| २२. डॉ. महेश तिवारी, नागपूर | सदस्य |
| २३. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय | सदस्य सचिव |

२. या समितीमध्ये संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना समितीच्या बैठकीचे आयोजन करण्यासाठी समितीचे सदस्य सचिव म्हणून नेमण्यात येत आहे. मात्र, नाटकांचे परीक्षण हे तज्ञांमार्फतच होणे आवश्यक असल्यामुळे प्रशासकीय अधिकारी असणा-या संचालक, सांस्कृतिक कार्य यांना नाटकाचे परीक्षण करण्याचे अधिकार राहणार नाहीत.

३. या समित्यांची मुदत हा शासन निर्णय निर्गमित केल्यापासून ३ वर्षाच्या कालावधीसाठी किंवा समितीची पुनर्रचना होईपर्यंत एवढया कालावधीसाठी राहील.

४. नाट्य परीक्षण समितीच्या सदस्यांना प्रत्येक नाटकासाठी रुपये ५००/- इतके मानधन तसेच त्यांचा प्रवास खर्च रेल्वेच्या ए.सी.टू टायर प्रवासाच्या दरानुसार मंजूर करण्यात येईल. तसेच त्यांच्या भोजन व निवासाची व्यवस्था सांस्कृतिक कार्य संचालनालयामार्फत करण्यात येईल.

५. नाट्य परीक्षण समितीमधील सदस्य अनुदानासाठी अर्ज केलेल्या नाटकाच्या लेखन/ दिग्दर्शन / अभिनय / तंत्रज्ञ / संगीत किंवा अन्य बाबींशी संबधित असतील तर सदर सदस्यास संबंधित नाटकाचे परीक्षण करता येणार नाही.

६. नाटकाचे परीक्षण करण्यासाठी २२ सदस्यांपैकी किमान ११ सदस्यांची गणसंख्या असणे आवश्यक राहील.

७. समितीच्या अशासकीय सदस्यांना वित्त विभागाच्या प्रचलित शासन निर्णयानुसार बैठक भत्ता अनुज्ञेय राहील.

८. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

९. यासाठीचा खर्च हा मागणी क्र. झेडडी-२, प्रधान लेखाशीर्ष २२०५ कला व संस्कृती, १०२ कला व संस्कृती यांचे प्रचालन, (०५) (०१) कला व सांस्कृतिक संस्थांना सहाय्यक अनुदान

(२२०५ १६२३) योजनेतर, ३१ सहाय्यक अनुदान या लेखाशीर्षाखालील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१९०२१२१५०५४८९४२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

Digitally signed by Vilas Ramrao Thorat
Date: 2019.02.12 15:12:53 +05'30'

**( विलास रा. थोरात )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
३. उप सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई
५. समितीचे सर्व सदस्य (संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालयामार्फत निर्गमित)
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १/२ मुंबई/नागपूर महाराष्ट्र राज्य
९. महालेखापाल (लेखा परीक्षा ) - १/२ मुंबई/नागपूर महाराष्ट्र राज्य
१०.अवर सचिव, अर्थसंकल्प शाखा, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
११.निवड नस्ती, सां.का.४